सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात जिल्हा/ विभागीय संदर्भ सेवा/ स्त्री / सामान्य/ उपजिल्हा/ ग्रामीण/ कुटीर/ ट्रामा व इतर रुग्णालयांसाठी रुग्णालयीन कापड-चोपड ( लिनन) खरेदीची देयके अदा करण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०१४६ व लेखाशिर्ष २२१० ०४१३ अंतर्गत २१- पुरवठा व सामग्री या उद्दिष्टांतर्गत रु.४,७८,९१,९७७/-इतका निधी वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२३/प्र.क्र २५१/आरोग्य-८**

१० वा मजला, गोकुळादास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,

नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.

दिनांक : ०७ मार्च, २०२५

**वाचा :-**

(१) सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्र. आसेआ/कक्ष-३ /टे-४/औ.सा.खरेदी/२३-२४/प्र.मा/२०२३,दि.२०.१०.२०२३

(२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-१२२३/प्र.क्र.२५१/आरोग्य-८, दि. २७.१२.२०२३

(३) शासन शुध्दीपत्रक,सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-१२२३/प्र.क्र.२५१/आरोग्य-८, दि. २४.०१.२०२४

(४) शासन शुध्दीपत्रक,सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-१२२३/प्र.क्र.२५१/आरोग्य-८, दि. ०८.०२.२०२४

(५) कक्ष अधिकारी,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग यांचे पत्र क्र.कापड-२०२४/प्र.क्र.२७/टेक्स-३, दि. १८.०३.२०२४

(६) शासन परिपत्रक,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कापड-२०१८/प्र.क्र.४२/टेक्स-३, दि. १८.०४.२०१८

(७) उद्योग संचालनालय,मध्यवर्ती भांडार खरेदी संघटना, मुंबई यांचे आदेश क्र.भांखस/हातमाग दरनिश्चिती/१०/२०२३-२४/सी-१२१२९,दि. १९.१०.२०२३

(८) सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्र. आसेआ/कक्ष-३/नस्ती क्र.६३/टे-४/लिनन देयके २०२३-२४/१६३४२-४४/२०२४, दि.११.१२.२०२४.

**प्रस्तावना:-**

वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दि.२०.१०.२०२३ रोजीच्या पत्रान्वये सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, वाचा मधील अ.क्र. २ येथील दिनांक.२७.१२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये व अ.क्र. ३ ते ४ येथील अनुक्रमे दिनांक.२४.०१.२०२४ आणि दिनांक.०८.०२.२०२४ रोजीच्या शासन शुध्दीपत्रकान्वये, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी जिल्हा/ स्त्री/ सामान्य/ उपजिल्हा/ ग्रामीण रूग्णालय व इतर आरोग्य संस्थांकरीता औषधी, कंझ्युमेबल्स, प्रयोगशाळा साहित्य, छोटी हत्यारे, सर्जिकल, रूग्णालयीन कापड-चोपड इत्यादी बाबींची खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या आहेत. त्यानुषंगाने सहसंचालक, आरोग्य सेवा ( खरेदी कक्ष ) ,मुंबई यांनी

राज्यातील आरोग्य संस्थांसाठी आवश्यक रूग्णालयीन कापड-चोपड (लिनन) च्या बाबींचा पुरवठा करण्याकरीता सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना विनंती केल्यानुसार, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी वाचा मधील अ.क्र. ५ येथील आदेशान्वये कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर यांना वस्त्रोद्योग विभागाच्या शासन परिपत्रक क्र. कापड-२०१८/प्र.क्र.४२/टेक्स-३, दि.१८.०४.२०१८ व दि.२५.०४.२०१८ च्या शासन परिपत्रकानुसार कार्यवाही करून पुरवठा करण्याबाबत आदेशीत करण्यात आलेले आहे.

२. उपरोक्त वस्तुस्थितीनुसार, महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई यांनी १३ जिल्हयांकरीता (मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून) कापड-चोपड (लिनन) या बाबींचा पुरवठा करून रू.२,१५,२२,२६८/- इतक्या रक्कमेचे देयक तसेच महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर यांनी २१ जिल्हयांकरीता कापड-चोपड (लिनन) या बाबींचा पुरवठा करून रू.२,७१,६९,३६७/- असे एकूण रु. ४,८६,९१,६३५/- इतक्या रक्कमेच्या देयकास मान्यता देण्याची विनंती आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांना केलेली होती.

३. या संदर्भात वाचा मधील अ.क्र. ७ येथील उद्योग संचालनालयाच्या दि.१९.१०.२०२३ रोजीच्या आदेशामध्ये देय रकमेबाबतच्या अटीमध्ये नमूद केल्यानुसार“ पुरवठा कालावधीमध्ये मालाचा पुरवठा न झाल्यास उशीरा पुरवठा केलेल्या मालाच्या किंमतीवर ०.५ % प्रती आठवडा याप्रमाणे दंड मागणीकार कार्यालयामार्फत आकारला जाईल.” यानुसार पुरवठादार महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई यांनी मालाचा उशीरा पुरवठा केल्याने दंडात्मक रक्कम म्हणून रु. २,१२,७८३/- व महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर यांनी मालाचा उशीरा पुरवठा केल्याने दंडात्मक रक्कम म्हणून रु. ५,८६,८७५/- असे एकूण रु.७,९९,६५८/- इतकी रक्कम आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांनी आकारणी केलेली आहे.

४. वर नमुद वाचा मधील अ.क्र.८ येथील दि.११.१२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई यांचे देयक रू.२,१५,२२,२६८/- व महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर यांचे देयक रू.२,७१,६९,३६७/- असे एकूण रू. ४,८६,९१,६३५/- (अक्षरी रूपये चार कोटी शहाऐंशी लक्ष एक्याण्णव हजार सहाशे पस्तीस फक्त) इतक्या रक्कमेची देयके सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२१० ०१४६ व २२१० ०४१३ अंतर्गत २१-पुरवठा व सामग्री या उद्दीष्टाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून अदायगी करण्यासाठी वित्त विभागास प्रस्ताव पाठविण्यात आला होता.सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने वित्त विभागाने महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई व महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर यांनी राज्यातील आरोग्य संस्थांना कापड-चोपड (लिनन) या बाबींचा पुरवठा उशीरा केल्याने त्यासाठी आकारण्यात येणारी दंडात्मक रक्कम वजा करून उर्वरीत रु. ४,७८,९१,९७७/- इतका निधी विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन वितरीत व खर्च करण्यास मान्यता दिलेली आहे.

५. उपरोक्त परिच्छेद ४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नियंत्रणाखालील सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात जिल्हा/ विभागीय संदर्भ सेवा/ स्त्री / सामान्य/ उपजिल्हा/ ग्रामीण/ कुटीर/ ट्रामा व इतर रुग्णालयांसाठी रुग्णालयीन कापड-चोपड ( लिनन) च्या खरेदीची देयके अदा करण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०१४६ व लेखाशिर्ष २२१० ०४१३ अंतर्गत २१- पुरवठा व सामग्री या उद्दिष्टांतर्गत महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई व महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर यांची देयके अदा करण्यासाठी दंडात्मक रक्कम वजा करता रु. ४,७८,९१,९७७/- इतका निधी वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

६. सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांनी त्यांच्या दि.११.१२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने तसेच वित्त विभागाने मान्यता दिल्याप्रमाणे, सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात जिल्हा/ विभागीय संदर्भ सेवा/ स्त्री / सामान्य/ उपजिल्हा/ ग्रामीण/ कुटीर/ ट्रामा व इतर रुग्णालयांसाठी रुग्णालयीन कापड-चोपड ( लिनन) याबाबींचे देयके अदा करण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०१४६ व लेखाशिर्ष २२१० ०४१३ अंतर्गत २१- पुरवठा व सामग्री या उद्दिष्टांतर्गत महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई व महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर यांची पुरवठा देयके अदा करण्यासाठी दंडात्मक रक्कम वजा करता रु. ४,७८,९१,९७७/- इतका निधी विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन खर्च करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) उपरोक्त योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षातील लेखानुदान खर्चाचे तसेच मागील वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या अधिन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच, वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळोवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करुन कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई, सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई तसेच आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई, यांची राहील.

(२) संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी वरीलप्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनातूनच खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे खर्चाचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्याची जबाबदारी, सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई , सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई तसेच आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांची राहील.

(३)सदरचा खर्च लेखाशिर्ष २२१० ०१४६ व लेखाशिर्ष २२१० ०४१३ अंतर्गत २१- पुरवठा व सामग्री या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून करण्यात यावा.

(४)सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांनी राबविलेल्या खरेदी प्रक्रियेच्या संदर्भात पुरवठा आदेश, पुरवठादाराने माल पोहच केलेल्या पावत्या याबाबतची खात्री करूनच निधी वितरीत करण्याची कार्यवाही करण्याची जबाबदारी सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांची राहील.

(५)तसेच सदर निधी ज्या बाबींसाठी उपलब्ध करून देण्यात आलेला आहे त्याच बाबीसाठी खर्च करण्यात यावा.तसेच सदर निधी खर्ची पडल्यानंतर त्याची उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची संपूर्ण जबाबदारी सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई व सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई यांची राहील.

**७.** लेखाशिर्ष २२१० ०१४६ व लेखाशिर्ष २२१० ०४१३, (२१) पुरवठा व सामग्री या उदिष्टा अंतर्गत वितरित तरतूदीचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

## विवरणपत्र-अ
## अनुदानाचा तपशील

(रक्कम रुपयांत)

| अ .क्र. | लेखाशिर्ष | मंजूर अनुदान सन २०२४-२५ | BDS प्रणालीवर उपलब्ध अनुदान | स्थानिक खरेदीसाठी वितरीत अनुदान | प्रत्यक्ष खर्च | शिल्लक अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | **२२१० ०१४६** | ३१,७४,२८,०००/- | १०,५८,०९,३३३/- | ५,५७,४२,८००/- | ४,१७,१६,२३२/- | १,४०,२६,५६८/- |
| २. | **२२१० ०४१३** | १३,७१,०६,०००/- | ४,५७,०२,०००/- | १,३७,१०,६००/- | ६५,३७,४८९/- | ७१,७३,१११/- |

## विवरणपत्र-ब
## देयकांचा तपशील

(रक्कम रुपयांत)

| अ.क्र. | पुरवठादाराचे नाव | एकूण देयकाची रक्कम | दंडात्मक रक्कम | दंडात्मक रक्कम वजा करून अदा करावयाचे देयक |
|---|---|---|---|---|
| | (अ) | (ब) | (क) | (ड) = (ब) - (क) |
| १. | महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई | रू. २,१५,२२,२६८/- | रू. २,१२,७८३/- | रू.२,१३,०९,४८५/- |
| २. | महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर | रू. २,७१,६९,३६७/- | रू. ५,८६,८७५/- | रू. २,६५,८२,४९२/- |
| | एकूण | रू. ४,८६,९१,६३५/- | रू. ७,९९,६५८/- | रू. ४,७८,९१,९७७/- |

८. तसेच सदर खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची व सनियंत्रण करण्याची संपूर्ण जबाबदारी, सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई तसेच आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांची राहील.

९. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी. तसेच सदर निधी ज्या बाबींसाठी मंजूर करण्यात आलेला आहे त्याच बाबींसाठी खर्च करण्यात यावा.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६९९/२०२४/व्यय-१३, दिनांक २७.१२.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०७१२५६०१०९१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2025.03.07 13:14:52 +05'30'

**(विकास तु.कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
४) सहसंचालक,आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई./पुणे
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षण/लेखा अनुज्ञेयता),मुंबई /नागपूर.
७) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
८) वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
९) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
११) निवडनस्ती (आरोग्य-८)